सेवार्थ प्रणालीतील विदा (Data) अद्ययावत करण्याबाबत सूचना...

**महाराष्ट्र शासन**

**वित्त विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांक संकिर्ण-२०२२/प्र.क्र.२९/कोषा प्रशा-४**

३ रा मजला, दालन क्रमांक ३३९, मादाम कामा मार्ग

हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२

दिनांक: ९ एप्रिल, २०२५

**प्रस्तावना -**

सद्यस्थितीत सर्व शासकीय कार्यालयांकडून राज्य शासकीय अधिकारी कर्मचाऱ्यांच्या मासिक वेतन देयंकाच्या संस्करणसाठी व अनुंषगिक कामकाजासाठी सेवार्थ प्रणाली वापरली जात आहे. शासकीय कामकाजासाठी सेवार्थ प्रणालीचे अन्य शासकीय प्रणलीशीं एकात्मिककरण करण्याची आवश्यकता भविष्यात निर्माण होऊ शकते. त्यामुळे सर्व शासकीय अधिकारी /कर्मचाऱ्यांच्या संदर्भातील सेवार्थ प्रणालीतील विदा (Data) सर्वसमावेशक व अद्ययावत असणे आवश्यक आहे. त्याअनुषंगाने खालील सात बाबींची माहिती अद्ययावत करून घेण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

१. मोबाईल क्रमांक
२. वैवाहिक स्थिती (Marital Status)
३. आईचे नाव
४. वडिलांचे नाव
५. जोडीदाराचे नाव (Spouse Name)
६. पत्ता
७. पिन कोड

**शासन परिपत्रक :-**

उक्त प्रस्तावनेस अनुसरुन सर्व आहरण व संवितरण अधिकारी, अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई, सर्व जिल्हा कोषागार अधिकारी आणि सर्व उप कोषागार अधिकारी यांना खालीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत.

१. सद्यस्थितीत सेवार्थ प्रणालीची माहिती उपरोक्त बाबींची माहिती नोंदवण्यासाठी सुविधा उपलब्ध करुन देण्यात आलेली आहे. सदर बाबींची माहिती प्रणालीमध्ये नोंदविल्याशिवाय संबंधित आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना नवीन कर्मचाऱ्यांची माहिती पूर्ण करता येणार नाही.

२. सध्या ज्या आहरण व संवितरण अधिकाऱ्यांच्या कार्यालयातील कार्यरत असलेल्या अधिकारी/ कर्मचाऱ्यांची उक्त बाबींची माहिती अपूर्ण आहे, त्या आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना सदर माहिती नोंदविणे बंधनकारक राहील.

३. सर्व आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी उक्त माहिती विहित मुदतीत म्हणजेच माहे एप्रिल, २०२५ चे मासिक वेतन देयक तयार करण्यापूर्वी प्रणालीमध्ये नोदविणे अनिवार्य आहे. आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी सदर माहिती पूर्ण नोदविली नाही, तर अशा आहरण व संवितरण अधिकाऱ्यांच्या कार्यालयाचे माहे एप्रिल, २०२५ देय माहे मे, २०२५ चे मासिक वेतन देयक यथास्थिती अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई किंवा जिल्हा कोषागार कार्यालय किंवा उप कोषागार कार्यालय येथे स्विकारले जाणार नाही.

४. सेवार्थ प्रणालीमध्ये उपरोक्त सात बाबींची माहिती अद्ययावत करण्यासाठी खालीलप्रमाणे मार्गक्रमण करावे.

| SR No. | Field Name | Utility Name to update details | Path | Login Level |
|---|---|---|---|---|
| 1. | Mobile Number | Update Mobile Number | Worklist > Payroll >Update Employee Details >Update Mobile Number | DDO_AST |
| 2. | Marital Status | Change Other Details | Worklist > Payroll > Changes > Change Other Details > Personal Details | DDO_AST |
| 3. | Mother Name | | | |
| 4. | Father Name | | | |
| 5. | Spouse Name | | | |
| 6. | Address | | | |
| 7. | PIN Code | | | |

५. सदर माहिती DDO_AST या लॉगीनमध्ये प्रथम अद्ययावत करून DDO लॉगीनमध्ये Worklist > Payroll > Changes > Drafts of Changes या Path व्दारे Approve करावी.

६. आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी उपरोक्तप्रमाणे माहिती अद्ययावत केल्यानंतर याबाबतचा अहवाल सेवार्थ प्रणालीमधून संस्करीत होईल. आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी सदर अहवालाची प्रत माहे एप्रिल, २०२५ देय माहे मे, २०२५ च्या मासिक वेतन देयका सोबत जोडून वेतन देयक यथास्थिती अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई किंवा जिल्हा कोषागार कार्यालय किंवा उप कोषागार कार्यालय येथे सादर करावे.

७. सदर कार्यवाही पूर्ण न केल्यास माहे एप्रिल, २०२५ देय मे, २०२५ चे मासिक वेतन देयक यथास्थिती अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई किंवा जिल्हा कोषागार कार्यालय किंवा उप कोषागार कार्यालय येथे स्वीकारले जाणार नाही, याची सर्व आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी गांभीर्याने नोंद घ्यावी.

८. सेवार्थ प्रणालीमध्ये उपरोक्त सात बाबींची माहिती अद्ययावत करण्यामध्ये कसूर झाल्यामुळे माहे एप्रिल, २०२५ देय मे, २०२५ च्या मासिक वेतन देयकास विलंब झाल्यास त्यासाठी संबंधित आहरण संवितरण अधिकारी व्यक्तीश: जबाबदार राहतील.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०२५०४०९१५५७४५९८०५ असा आहे. हे शासन परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

DR RAJENDRA UTTAMRAO GADEKAR

Digitally signed by DR RAJENDRA UTTAMRAO GADEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FINANCE DEPARTMENT, 2.5.4.20=b8e8c3a034acb70f16af6f81c69ca038ff6f25ff78cfc9e6d815fd95b5367b07, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=37A42E182BACE4C129ABBEB54E27836D32D401560638F644A547867205474EE5, cn=DR RAJENDRA UTTAMRAO GADEKAR
Date: 2025.04.09 15:58:32 +05'30'

**(डॉ.राजेंद्र सुमन उत्तमराव गाडेकर)**
**शासनाचे उप सचिव**

**प्रति,**

१. सर्व आहरण व संवितरण अधिकारी.
२. अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
३. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
४. सर्व उप कोषागार अधिकारी.

**प्रत-**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव / प्रधान सचिव.
२. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव / प्रधान सचिव / अपर मुख्य सचिव
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव / प्रधान सचिव.
४. सर्व मा.मंत्री व मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
५. मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई.
६. सर्व मा. विधानसभा / विधान परिषद व संसद सदस्य.
७. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग
८. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांच्या अधिनस्त असलेले सर्व विभाग प्रमुख / प्रादेशिक कार्यालय प्रमुख / कार्यालय प्रमुख
९. प्रबंधक, मूळ न्यायालय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई
१०. प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)- १, महाराष्ट्र, मुंबई
११. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई
१२. महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर
१३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर
१४. आयुक्त, आयकर (TDS) चर्नीरोड, मुंबई
१५. आयुक्त, आयकर (TDS) सिव्हील लाईन, नागपूर
१६. प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा) मुंबई
१७. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
१८. सचिव, महाराष्ट्र विधीमंडळ सचिवालय, मुंबई

१९. प्रबंधक, लोक आयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
२०. प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई
२१. मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२२. विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली
२३. सर्व विभागीय आयुक्त
२४. सर्व जिल्हाधिकारी
२५. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
२६. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
२७. संचालक, स्थानिक निधी लेखा परिक्षा, कोकणभवन, नवी मुंबई
२८. सहसंचालक, लेखा व कोषागारे, कोकण/पुणे/नाशिक/ छत्रपती संभाजी नगर/अमरावती/नागपूर
२९. सहसंचालक, स्थानिक निधी लेखा परिक्षा, कोकण/पुणे/नाशिक/छत्रपती संभाजी नगर/ अमरावती/ नागपूर
३०. वित्त विभागातील सर्व कार्यासने
३१. निवड नस्ती/कोषा प्रशा-४